१० व्या नाशिक आंतरराष्ट्रीय चित्रपट
महोत्सवास अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आंचिम-२०१८/प्र.क्र.१९/सां.का.१**
विस्तार भवन, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.आंचिम-२०११/प्र.क्र.१५८/सां.का.१, दि.१८.१०.२०१२.
२) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र, क्र.सां.का.सं./७६४, दि.१६.०२.२०१८.
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.आंचिम-२०१८/प्र.क्र.१९/सां.का.१, दि.२०.०३.२०१८.
४) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र, क्र.सां.का.सं./२१८८, दि.२१.०५.२०१८.
५) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र, क्र.सां.का.सं./४१६३, दि.१७.०९.२०१८.

**<u>प्रस्तावना</u> :**

उपर्निर्दिष्ट क्रमांक १ येथील शासन निर्णय दि.१८.१०.२०१२ अन्वये आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाचे आयोजन करणाऱ्या संस्थांना अर्थसहाय्य देण्याबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. या धोरणास अनुलक्षून, मेट्रो फाऊंडेशन ऑफ इंडिया व कलावैभव संस्था, नाशिक या संस्थांनी दि.२२ ते २५ मार्च, २०१८ या कालावधीत आयोजित केलेल्या १० व्या नाशिक आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवासाठी उपर्निर्दिष्ट क्रमांक ३ येथील शासन निर्णय दि.२०.०३.२०१८ अन्वये रु.४.०० लक्ष इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यात आले होते. तथापि, सदर शासन निर्णयात वित्त विभाग, शासन निर्णय दि.१८.०४.२०१७ मधील अटींची पूर्तता केल्याचा उल्लेख नसल्याचा आक्षेप नोंदवून सदर देयक अधिदान व लेखा कार्यालयाकडून परत करण्यात आले होते. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई कार्यालयाकडून सदर आक्षेपाच्या पूर्ततेकरीता आवश्यक ती कार्यवाही दि.३१.०३.२०१८ पर्यंत न झाल्याने उक्त रु.४.०० लक्ष अर्थसहाय्याचे प्रत्यक्ष प्रदान सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षात होऊ शकले नाही. त्यामुळे उपर्निर्दिष्ट क्रमांक ३ येथील शासन निर्णय रद्द करुन सदर संस्थेस १० व्या नाशिक आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवासाठी रु.४.०० लक्ष इतके अर्थसहाय्य आर्थिक वर्ष सन २०१८-२०१९ मध्ये वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :

उपर्निर्दिष्ट क्रमांक ३ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत असून या शासन निर्णयान्वये मेट्रो फाऊंडेशन ऑफ इंडिया व कलावैभव संस्था, नाशिक या संस्थांनी दि.२२ ते २५ मार्च, २०१८ या कालावधीत आयोजित केलेल्या १० व्या नाशिक आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवासाठी शासनातर्फे **रु.४.०० लक्ष (रुपये चार लक्ष फक्त)** इतके अर्थसहाय्य खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) मंजुर केलेले अर्थसहाय्य हे मुंबई वित्तीय नियमानुसार अनुज्ञेय राहील.
२) मंजुर केलेले अर्थसहाय्य हे अनावर्ती असेल व शासनाच्या नेहमीच्या अर्थसहाय्यासंदर्भातील अटी व शर्ती यांच्या अधिन राहून असेल.
३) या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३ महिन्यात उपयोगिता प्रमाणपत्र, जमाखर्चाचा तपशिल (Profit and Loss Accoount) व खर्चाचा ताळेबंद (Balance Sheet) सादर करणे बंधनकारक राहील.
४) आयोजक संस्थेला शासन निर्णय दि.१८.१०.२०१२ अन्वये घोषित धोरणातील सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

५) उपरोक्त नमूद ३ व ४ येथील अटींच्या पूर्ततेची खातरजमा संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांनी करुन घ्यावी.

२. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना संबंधीची देयके आहरित करुन संवितरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च " मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला आणि संस्कृती, (००) १०२ कला व संस्कृती प्रचालन, (०३) कला संस्कृति प्रचालन (०३) (०६) आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव (२२०५ १५८१), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) " या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. ही मान्यता, शासन निर्णय क्र.विअप्र-२१३/विनियम, दि.१७ एप्रिल २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग ३, अ.क्र.४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार व शासन निर्णय क्र.आंचिम २०११/प्र.क्र.१५८/सां.का.१, दि.१८ ऑक्टोबर, २०१२ अन्वये प्राप्त खर्च करण्याच्या अधिकारानुसार देण्यात येत आहे. प्रस्तावित खर्चासंदर्भात वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद क्र.६ (अ)(ब), ७(१अ)(३) तसेच परिशिष्टातील अ.क्र.८ मधील अट क्र.१,२,३,४,५,१० ची पूर्तता होत असून उर्वरीत सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटी या प्रकरणी लागू होत नाहीत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१११५१३०९०६१२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2018.11.16 15:26:44 +05'30'

**( शैलेश तु. जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी.
२) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल ( लेखापरीक्षा )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
८) महोत्सव संचालक, मेट्रो फाऊंडेशन ऑफ इंडिया व कलावैभव संस्था, ए-१, रामबाग सीएचएस-२, गंगापूर रोड, नाशिक - ४२२ ०१३.
९) अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांना उक्त अनुदानाची रक्कम अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित )
१०) निवड नस्ती सां.का.१.